केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) नांदेड जिल्हयातील महानगरपालिका, नांदेड-वाघाळा येथे सद्भाव मंडप बांधकामासाठी मान्यताप्राप्त अनुदान वितरीत करण्याबाबत (केंद्र हिस्सा+राज्य हिस्सा) सन २०२१-२२.

# महाराष्ट्र शासन

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः** अविवि-२०२०/प्र.क्र.५९/का.७,

मादाम कामा रोड, हुतात्मा चौक

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक: - ३१ मार्च, २०२२

**संदर्भ:-** १. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. MsDP-१३/६५/२०२१-MsDP-MOMA, दि ०६/०१/२०२२

२. जिल्हाधिकारी, नांदेड यांचे पत्र.क्र.अल्पसंख्याक/सा.शा-१/ PMJVK / २२५९३, दि. २२.०६.२०२०.

३. जिल्हाधिकारी,नांदेड यांचे पत्र.क्र.अल्पसंख्याक/सा.शा-१/ PMJVK / २५१११, दि. १०.०७.२०२०

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) राज्यातील महानगरपालिका, नांदेड-वाघोळा, जि.नांदेड येथे अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप बांधकामाचा रु. २३४.०० लाख इतक्या किंमतीचा प्रस्ताव मा.मुख्य सचिव, यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय संनियंत्रण समितीच्या सहमतीने केंद्र शासनास पाठविण्यात आला होता.

२. केंद्र शासनाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत (PMJVK) गठित शक्तिप्रदान समितीने दि. २३ डिसेंबर, २०२२१ रोजी झालेल्या ३५ (२) व्या बैठकीत नांदेड जिल्हयातील नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका येथे अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप बांधकामासाठी एकूण ***रु.१,४०,००,०००.००/- (अक्षरी रू. एक कोटी चाळीस लक्ष फक्त)*** इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता दिली असल्याचे संदर्भ क्र. (१) अन्वये कळविण्यात आले आहे.

केंद्र शासनाने संदर्भ क्र. (१) येथील आदेशाद्वारे PMJVK अंतर्गत मान्यताप्राप्त नांदेड जिल्हयातील नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका येथे अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप बांधकामासाठी केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील एकूण ***रु.४२,००,०००.००/- (अक्षरी रू. बेचाळीस लक्ष फक्त)*** इतकी तरतूद मंजूर/वितरित केली आहे. PMJVK अंतर्गत नांदेड जिल्हयातील नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका येथे सद्भाव मंडप बांधकामासाठी केंद्र शासनाकडून मंजूर/वितरित करण्यात आलेली केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील अनुक्रमे **रु.४२,००,०००.००/-** ***( अक्षरी रू. बेचाळीस लक्ष फक्त)*** तसेच राज्य हिश्यातील ***रु.२८,००,०००.००/- ( अक्षरी रू. अठ्ठावीस लाख फक्त)*** अशी एकूण ***रु.७०,००,०००.००/- ( अक्षरी रूपये सत्तर लक्ष फक्त)*** इतका निधी जिल्हाधिकारी, नांदेड यांना मंजूर करुन वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

३. केंद्र शासनाकडून संदर्भ क्र. (२) येथील आदेशाव्दारे PMJVK अंतर्गत नांदेड जिल्हयातील नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका येथे अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप बांधकामासाठी मंजूर/वितरित करण्यात आलेली केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील ***एकूण रु.४२,००,०००.००/- ( अक्षरी रू. बेचाळीस लक्ष फक्त)*** तसेच राज्य हिश्यातील ***रु.२८,००,०००.००/- ( अक्षरी रू. अठ्ठावीस लक्ष फक्त) अशी एकूण रु.७०,००,०००.००/- ( अक्षरी रूपये सत्तर लक्ष फक्त)*** इतकी रक्कम जिल्हाधिकारी, नांदेड यांना खालील प्रमाणे वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

(रू. लाखात)

| अ.क्र | प्रकल्पाचे नाव | प्रकल्पाचे ठिकाण | एकूण संख्या | युनिट किंमत | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण किंमत | केंद्र शासनाचा पहिला हप्ता | राज्य शासनाचा पहिला हप्ता |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 |
| 1 | सद्भाव मंडप/CSC बांधकामासाठी | सर्व्हे क्र. ७७, विनायक नगर, वाघाळा शहर, महानगर पालिका क्षेत्र, नांदेड. | १ | १४० | ८४.०० | ५६.०० | १४०.०० | ४२.०० | २८.०० |
| एकूण | | | **१** | **१४०** | **८४.००** | **५६.००** | **१४०.००** | **४२.००** | **२८.००** |

४. केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाद्वारे निधी वितरणासाठी सार्वजनिक वित्तीय प्रणालीची (PFMS) सुधारीत कार्यपध्दती अंमलात आणली आहे. या कार्यपध्दतीस अनुसरून प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमाची PFMS प्रणाली वर Mapping करण्यात आली आहे. व अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग,मंत्रालय यांची Single Nodal Agency (SNA) म्हणून निवड करण्यात आली आहे. तसेच सदर योजनेचे SNA खाते स्टेट बँक ऑफ इंडीया,मंत्रालय शाखा येथे उघडण्यात आले आहे. तसेच जिल्हाधिकारी, नांदेड यांनी याचप्रकारे स्टेट बँक ऑफ इंडीया, नांदेड शाखा येथे खाते उघडले असून त्यास SNA खात्याशी PFMS प्रणाली वर MAP करण्यात आले आहे.

५. सन २०२१-२२ या वर्षात प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रमा अंतर्गत नांदेड जिल्ह्यातील नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका हद्दीतील सर्व्हे क्र. ७७, विनायक नगर येथे अल्पसंख्याकासाठी सद्भाव मंडप/CSC बांधकामासाठी केंद्र शासनाकडून निधी वितरीत करण्यात आला असून सदर निधी योजनेच्या स्टेट बँक ऑफ इंडीया,मंत्रालय शाखा येथे उघडण्यात आलेल्या SNA खात्यावर घेण्यात यावा.सदर निधी SNA खात्यावर जमा करून घेण्याकरीता सदर निधीचा ईसीएस (ECS) अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग यांच्या नावाने काढण्यात यावा.

६. उपरोक्त परि. क्र. (३) मधील तक्त्यातील स्तंभ क्र. (९) व (१०) प्रमाणे केंद्र शासनाने नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका हद्दीतील सर्व्हे क्र. ७७ विनायक नगर जि.नांदेड या ठिकाणी सद्भाव मंडप बांधकामासाठी मंजूर केलेल्या केंद्र हिश्यातील पहिल्या टप्प्यातील ***रू. ४२,००,०००.००/- (अक्षरी रूपये बेचाळीस लक्ष फक्त),*** तसेच त्यास समरूप राज्य हिश्यातील पहिल्या टप्प्यातील ***रू. २८,००,०००.००/- (अक्षरी रूपये अठ्ठावीस लक्ष रूपये फक्त)*** असा ***एकूण रु.१४०,००,०००/- ( अक्षरी रूपये एक कोटी चाळीस लक्ष फक्त)*** रकमेच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरित व संवितरित करण्यास **या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे**. याकरीता ते आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व उपसचिव ( अर्थसंकल्प), अ.वि.वि. हे नियंत्रक म्हणून काम पाहतील.

७. अवर सचिव (१), अ.वि.वि यांनी उपरोक्त प्रमाणे त्यानां आहरित केलेला निधी स्टेट बँक ऑफ इंडीया, मंत्रालय शाखा येथे उघडण्यात आलेल्या योजनेच्या SNA खात्यामध्ये जमा करावी. सदर SNS Account **चे खाते क्र. ४०५३३३४५६७८ व IFSC Code - SBIN००६१५२४ असा आहे**. तदनंतर सदर रक्कम अर्थसंकल्प शाखेतील PFMS प्रणालीद्वारे जिल्हाधिकारी, नांदेड यांना वितरित करण्यात यावी. जिल्हाधिकारी, नांदेड यांनी सदर रक्कम विकासकामांच्या अंमलबजावणीशी संबंधित यंत्रणेस रितसर वितरित करावी.

८. प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रम (PMJVK) अंतर्गत सद्भाव मंडप बांधकामाच्या अंमलबजावणीकरीता संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी मुख्य नियंत्रक अधिकारी व अंमलबजावणी अधिकारी राहतील.

९. प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रम (PMJVK) अंतर्गत मान्यताप्राप्त नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका येथील अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप बांधकाम हे केंद्र शासनाच्या टाईप-१ च्या टाईपप्लॅननुसार तसेच, यासाठीच्या सविस्तर अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेल्या तांत्रिक मंजूरीनुसार सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात यावे. प्रस्तुत सद्भाव मंडप बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकिय मान्यता देण्याबाबत आदेश **दिनांक ३१/०३/२०२२** च्या शासन ज्ञापनान्वये निर्गमित करण्यात आले आहेत.

१०. प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रम (PMJVK) अंतर्गत मान्यताप्राप्त सद्भाव मंडप बांधकामाच्या अंमलबजावणीसाठी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने आवश्यक त्या बाबींची त्वरेने पूर्तता करुन घ्यावी. शासन निकषानुसार तसेच सद्भाव मंडप बांधकामाच्या अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकरणाने दिलेल्या तांत्रिक मंजुरीनुसार यासाठीच्या निविदा प्रक्रिया करुन कामास तात्काळ सुरुवात करावी व तसे शासनास अवगत करावे.

११. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता संबंधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी संबंधित जिल्हाधिकारी यानी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

१२. प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रम (PMJVK) अंतर्गत मान्यताप्राप्त सद्भाव मंडप बांधकामासाठी केंद्र व राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) विहित नमुन्यात (अद्ययावत छायाचित्रासह) संबंधीत अंमलबजावणी यंत्रणेने जिल्हाधिकारी यांच्यामार्फत शासनास सादर करावीत. तसेच विभागाच्या Construction tracker प्रणालीवर देखील विकासकामांची माहिती व छायाचित्रे वेळोवेळी upload करावी.

१३. केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या दि.१४/१२/२०१५ रोजीच्या बैठकीतील सूचनानुसार प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमाअंतर्गत (PMJVK) ज्या प्रयोजनाकरिता निधी मंजूर करुन वितरित केला आहे, त्याच प्रयोजनार्थ सदर निधी खर्च करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत अन्य प्रयोजनाकरिता सदर निधी खर्च केल्यास सर्व संबंधित अधिकाऱ्यांवर विनाविलंब कारवाई करण्यात येईल.

१४. केंद्र शासनाच्या मान्यतेनुसार सद्भाव मंडप बांधकामातंर्गत केंद्र हिश्श्यावर होणारा खर्च “मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (००) (१७) प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रम (केंद्र हिस्सा) (कार्यक्रम) (२२३५ ए ५४३), ३१ - सहाय्यक अनुदान (वेतनेतर)” तसेच राज्य हिश्श्यावर होणारा खर्च “मागणी क्रमांक झेडई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (०१)(१४ प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रम (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (२२३५ ए २३१) ३१- सहाय्यक अनुदान (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा.

१५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दि. २४ जून,२०२१ व दि. १४ ऑक्टोंबर, २०२१ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२२०३३११६११५७७२१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, pseudonym=1F9A10571D88646ED6CD168DADBFEDACC3DD2F35, serialNumber=6ADB2BDBBD3BD651A8ADE806B6E4AEA66DAA5512EA788889AF1515751ABC0181, cn=DINESH MADHAVRAO SONAVANE
Date: 2022.03.31 16:13:55 +05'30'

**( दि.म.सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अ.मु.सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. विभागीय आयुक्त, औरंग़ाबाद.
४. आयुक्त, महागरपालिका, नादेड-वाघाळा.
५. जिल्हाधिकारी,नांदेड
६. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
७. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर.
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद
९. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड
१०. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड
११. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड
१२. वित्त विभाग (अर्थसंकल्प -४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई.
१३. नियोजन विभाग (कार्या.१४७१)
१४. निवड नस्ती, (का.७)